**एदोगावा इंडिया कल्चरल सेंटर व टोक्यो मराठी मंडळ, जपान यांचेशी झालेल्या सामंजस्य कराराची अंमलबजावणी करण्यासाठी शालेय शिक्षण विभागांतर्गत कार्यालयांची जबाबदारी निश्चित करणे व समन्वय समिती स्थापन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०२४/प्र.क्र.४९/एसडी-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक:- १६ जुलै, २०२४

**प्रस्तावना:-**

विविध भारतीय भाषांचा विकास करणे, हे भाषिक तत्त्वावरील राज्यांची पुनर्रचना करण्यामागचे मुलभूत तत्त्वज्ञान आहे. भाषिक तत्त्वानुसार मराठी भाषा ही महाराष्ट्र राज्याची राजभाषा असून (महाराष्ट्र राजभाषा अधिनियम १९६४) ती एक प्राचीन विकसित भाषा आहे. मराठी भाषेने राज्याला सांस्कृतिक, सामाजिक ओळख निर्माण करून दिली असून त्या भाषेचे जतन व विकास करण्यासाठी राज्य वचनबद्ध आहे. विविध क्षेत्रात मराठीचा होणारा वापर अधिकाधिक गुणवत्तापूर्ण होण्याच्या दृष्टीकोनातून राज्यामध्ये केंद्र शासन कार्यालये, राज्य शासन कार्यालये, न्यायालयीन कामकाज व दैनंदीन व्यवहार यामध्ये मराठी भाषेचा वापर करण्यात येत आहे.

याचबरोबर परदेशी विद्यार्थ्यांना भारतीय संस्कृतीची ओळख व्हावी आणि मराठी भाषा समजावी, टिकून राहावी तसेच मराठी भाषेचा प्रचार व्हावा यासाठी अनेक संस्था, मंडळ प्रयत्नशील आहेत. एदोगावा इंडिया कल्चरल सेंटर व टोक्यो मराठी मंडळ,जपान हे तेथे मराठी भाषेच्या प्रचार व प्रसार या कार्यासाठी अनेक वर्षापासून काम करीत आहे. भाषा व संस्कृतीच्या क्षेत्रात मराठी भाषेची अभिवृध्दी करण्याच्या दृष्टीने एदोगावा इंडिया कल्चरल सेंटर व टोक्यो मराठी मंडळ,जपान यांच्याशी दिनांक ३१ जानेवारी, २०२४ मध्ये सामंजस्य करार करण्यात आला आहे. सदर सामंजस्य कराराची अंमलबजावणी करण्यासाठी शालेय शिक्षण विभागांतर्गत कार्यालयांची जबाबदारी निश्चित करणे व समन्वय समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय :-**

परदेशातील विद्यार्थ्यांना मराठी भाषा समजावी, टिकून राहावी,मराठी भाषेचा प्रचार व्हावा यासाठी जपान येथील मराठी भाषा शिकण्याची आवड असणाऱ्या मुलांचा शोध घेणे, त्यांची माहिती संकलित करणे, पाठ्यपुस्तक पुरवणे, अध्यापन करणे, परीक्षा घेण्याकरिता यंत्रणा निर्माण करणे, इयत्ता १ ली ते ५ वी च्या विद्यार्थ्यांची परीक्षा घेणे, प्रश्नपत्रिकांची पडताळणी करून प्राप्त श्रेणी नुसार इयत्ता पाचवीच्या विद्यार्थ्यांना राज्य बोर्डामार्फत प्रमाणपत्र प्राप्त करून घेणे व प्रमाणपत्राचे वाटप करणे इत्यादी बाबी सुलभ होण्याच्या दृष्टीने एदोगावा इंडिया कल्चरल सेंटर व टोक्यो मराठी मंडळ,जपान आणि शालेय शिक्षण विभाग, महाराष्ट्र शासन यांच्यामध्ये दिनांक ३१ जानेवारी, २०२४ सामंजस्य करार करण्यात आला आहे. सदर सामंजस्य कराराची अंमलबजावणी करण्यासाठी शालेय शिक्षण विभागांतर्गत कार्यालयांची जबाबदारी निश्चित करण्यास व समन्वय समिती स्थापन करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. वरील नमूद सामंजस्य कराराची अंमलबजावणी करण्यासाठी शालेय शिक्षण विभागांतर्गत असणाऱ्या विविध कार्यालयांची जबाबदारी खालील प्रमाणे निश्चित करण्यात येत आहे:-

**अ)** एदोगावा इंडिया कल्चरल सेंटर व टोक्यो मराठी मंडळ, जपान यांचे मार्फत मराठी भाषा शिकत असणाऱ्या इयत्ता १ ली ते ५ वीच्या विद्यार्थ्यांसाठी महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे (बालभारती) यांचे मार्फत पाठ्यपुस्तकांचा पुरवठा करण्यात येईल.

**ब)** एदोगावा इंडिया कल्चरल सेंटर व टोक्यो मराठी मंडळ, जपान यांना स्थानिक गरजेनुसार आवश्यक असल्यास पाठ्यपुस्तकांमध्ये २०% पर्यंत बदल करून देण्याचे अधिकार महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे (बालभारती) यांना राहतील.

**क)** राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे यांचे मार्फत इयत्ता प्रश्नपत्रिका तयार करणे तसेच आवश्यकतेनुसार एदोगावा इंडिया कल्चरल सेंटर व टोक्यो मराठी मंडळ, जपान यांच्या शिक्षकांना प्रशिक्षण देण्याची जबाबदारी राहील.

**ड)** राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र ,पुणे यांचे मार्फत एदोगावा इंडिया कल्चरल सेंटर व टोक्यो मराठी मंडळ, जपान यांना ग्रंथालयायाच्या पुस्तकांची यादी व याबाबत वेळोवेळी मार्गदर्शन पुरविण्यात येईल.

**इ)** एदोगावा इंडिया कल्चरल सेंटर व टोक्यो मराठी मंडळ, जपान यांच्या शाळेतील इयत्ता ५ वीच्या विद्यार्थ्यांना प्रमाणपत्र देण्याची जबाबदारी महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे यांची राहील.

ई) सदर सामंजस्य कराराची अंमलबजावणी करण्याच्या अनुषंगाने शासनाकडून कोणत्याही प्रकारचे आर्थिक सहाय्य उपलब्ध करुन देण्यात येणार नाही.

**३.** जपान मधील मराठी बांधव / भगिनी तसेच विद्यार्थी विद्यार्थिनी यांच्या मध्ये मराठी साहित्य व मराठी पुस्तके यांच्या वाचनाची गोडी लागावी, त्यांना वाचनासाठी व्यासपीठ उपलब्ध व्हावे यासाठी एदोगावा इंडिया कल्चरल सेंटर व टोक्यो मराठी मंडळ, जपान यांच्यामार्फत ग्रंथालयाची उभारणी केली जाईल व वाचन चळवळ वाढीस लागण्यासाठी विविध उपक्रम व कार्यक्रम हाती घेतले जातील.

**४.** एदोगावा इंडिया कल्चरल सेंटर व टोक्यो मराठी मंडळ, जपान यांच्यामार्फत चालविल्या जात असलेल्या शाळेमधील विद्यार्थ्यांमध्ये मराठी भाषेचा प्रसार करणे, त्यांना अभ्यासक्रम, पुस्तक उपलब्ध करून देणे, परीक्षा घेणे, प्रमाणपत्र देणे इत्यादी कामकाजाचा नियमित आढावा घेणे, सनियंत्रण करणे, व त्यानुसार आवश्यक नियोजन करणे व योग्य निर्णय घेणे यासाठी खालील प्रमाणे समन्वय समिती गठीत करण्यात येत आहे.

**समन्वय समिती :**

| अ.क्र. | समितीतील पद | अधिकाऱ्याचे पदनाम व कार्यालय |
|---|---|---|
| १ | अध्यक्ष | संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र , पुणे. |
| २ | सदस्य | अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे. |
| ३ | सदस्य | संचालक, महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे. |
| ४ | सदस्य | संचालक, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई |
| ५ | सदस्य | संचालक, एदोगावा इंडिया कल्चरल सेंटर, जपान |
| ६ | सदस्य | अध्यक्ष, टोक्यो मराठी मंडळ,जपान |
| ७ | सदस्य | सदस्य, एदोगावा इंडिया कल्चरल सेंटर, जपान |
| ८. | सदस्य | सदस्य, टोक्यो मराठी मंडळ,जपान. |
| ९. | सदस्य सचिव | उपसंचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद,महाराष्ट्र ,पुणे. |

**५. समन्वय समितीची कार्य**

i. एक महिन्यातून एकदा ऑनलाईन बैठक घेण्यात येईल आणि सदर बैठकीत प्रगतीचा व केलेल्या कामकाजाचा आढावा घेण्यात येईल.

ii. उपक्रमाची उद्दिष्टे साधण्यासाठी गरजेनुसार चर्चासत्राचे आयोजन करण्यात येईल.

iii. सदर उपक्रमा मध्ये बदल करण्याची आवश्यकता असल्यास बदल करण्याचे अधिकार शासनाच्या मान्यतेने समन्वय समितीचे असतील.

सदर उपक्रमाबाबत संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे हे समन्वय साधतील.

६.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याच संकेतांक २०२४०७१६१२०७०३२७२१ असा आहे.हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2024.07.16 12:19:57 +05'30'

**( तुषार महाजन )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,

२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,

३. मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

४. मा. उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

५. मा. अध्यक्ष व मा.उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई,

६. मा. सभापती व मा.उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई,

७. मा. मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

८. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

९. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे

१०. संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे

११. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे

१२. महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, बालभारती, पुणे

१३. संचालक, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई

१४. निवड नस्ती (एसडी-४).